सार्वजनिक बांधकाम विभागातील बांधकाम विषयक काम करतांना अनुसरायची पध्दती: हस्तपोच पावतीद्वारे फुटकळ खरेदी (Hand Receipts).

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएटी-०३/२०१५/प्र.क्र.६०/इमारती-२**
मंत्रालय, मुंबई — ४०० ०३२,
दिनांक : ३०/६/२०१५

**संदर्भ :**- (१) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकामे लेखासंहिता मधील परिच्छेद १०.२.१२
(२) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेमधील परिशिष्ट ४२ मधील बाब क्र.४०

**प्रस्तावना** :-

सद्य:स्थितीत सार्वजनिक बांधकाम विभागातील स्थापत्य विषयक कामे करीत असतांना कामाची वर्गवारी करण्यात येते. या वर्गवारीनुसार किरकोळ दुरुस्ती, विशेष दुरुस्ती, विर्निदिष्ट दुरुस्ती यामध्ये विगतवारी करुन सर्व शासकीय इमारतीच्या दुरुस्ती व देखभालीचे काम करण्यात येते. ही कामे करतांना क्षेत्रिय स्तरावर केलेल्या कामाचे प्रदान करताना हस्तपोच पावत्या (Hand Receipts) यांचा उपयोग केला जातो. या कामी कनिष्ठ अभियंता व शाखा अभियंता यांना प्रचलित पध्दतीने १०० टक्के अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

२. जनहित याचिका क्र.२८/२०१० च्या अनुषंगाने न्यायालयाने शासनाने काही बाबी स्पष्ट करावयाच्या सूचना दिलेल्या आहेत. याच अनुषंगाने नागपूर कंत्राटदार असोसिएशन यांनी शासनस्तरावर काही सुधारणा करण्याबाबत न्यायालयास सूचविले आहे. यासंदर्भात रिट याचिका क्र. २८/२०१० संदर्भात न्यायालयाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे शासनाच्या दिनांक २/१२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे अभ्यासगटाची नियुक्ती केली आहे. या अभ्यासगटाचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. या समितीने केलेल्या शिफारशीसंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील सर्व प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंत्यांसोबत दिनांक १२/३/२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या शिफारशींवर सविस्तर विचारविनिमय करण्यात आला. बैठकीस उपस्थित सर्व मुख्य अभियंतांनी त्यांचे अभिप्राय बैठकीमध्ये नमूद केले. या बैठकीमध्ये सर्वानुमते समितीने केलेल्या शिफारशींमधील काही महत्त्वाच्या बाबींबाबत न्यायालयाच्या निर्देशांप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे ठरले. त्यास अनुसरुन अभ्यासगटाने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये प्रचलित असलेल्या कार्यपध्दतीत काही सुधारणा करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय** :

शासकीय इमारतीच्या दुरुस्ती व देखभालीची कामे करताना क्षेत्रिय स्तरावर केलेल्या कामाचे प्रदान करताना प्रचलित कार्यपध्दतीनुसार हस्तपोच पावत्या (Hand Receipts) देण्याबाबत कनिष्ठ

अभियंता व शाखा अभियंता यांना प्रदान करण्यात आलेले अधिकार रद्दबातल करण्यात येत आहेत. तथापि खालील तीन अपवादात्मक परिस्थितीमध्ये यापुढे हस्तपोच पावतीद्वारे कामे करता येतील.

१) विधीमंडळ कामकाजाशी संबंधित
२) नैसर्गिक आपत्कालीन परिस्थितीत
३) राजशिष्टाचार संबंधित

सदरहू कामे हस्तपोच पावतीद्वारे करुन देयके प्रदान करतांना खालील कार्यपध्दती अनुसरण्यात यावी :-

हस्तपोच पावतीद्वारे देयके संपूर्णपणे उपअभियंता अथवा त्यांच्या वरिष्ठ पदावरील अधिका-याच्या मान्यतेने अदा करण्यात यावे. त्याकरिता प्रति वर्षी प्रत्येक कनिष्ठ अभियंता रुपये एक लक्ष वित्तीय मर्यादेपर्यंत संबंधित कार्यकारी अभियंता यांच्या मान्यतेने हस्तपोच पावती द्वारे अदा करण्यास सक्षम राहतील. हस्तपोच पावतीद्वारे रु. १ लक्ष या वित्तीय मर्यादेपेक्षा अधिकच्या कामास कार्यकारी अभियंता यांची लेखी मान्यता आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८०४१३०३३१८४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vidyadhar Dinkar Sardeshmukh

Digitally signed by Vidyadhar Dinkar Sardeshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidyadhar Dinkar Sardeshmukh
Date: 2015.08.04 13:07:33 +05'30'

**( वि.दि.सरदेशमुख )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग
२. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई
३. सर्व अधिक्षक अभियंता,सा.बां. मंडळ
४. सर्व कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग
५. सर्व मंत्रालयीन विभाग
६. स्वीय सहाय्यक, अपर मुख्य सचिव (सा.बां)/ सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सा.बां.विभाग, मुंबई
७. निवडनस्ती, इमारती-२ सा.बां.वि. मंत्रालय.